# मुलीला वाचवा



प्रत्येक अन्याया पासून मुलींना वाचवा






MAKE india BETTER




## प्रस्तावना :-

स्त्री गर्भपात हा शब्द आज मानवी समाजासाठी काही नवीन किंवा अपरिचीत नाही. सर्व मानव या विषयाशी परिचीत आहेत. हा आजच्या परिस्थितीत एक मुख्य विषय आहे. एक सज्जन मनुष्य याला सत्य रूपात स्विकारू शकत नाही व त्यांच्याकडे दुर्लक्षही करू शकत नाही. आमचा भारत देश एक पुरूष प्रधान देश आहे. जेथे पुत्र प्राप्तीला मानाचे स्थान दिले जाते. तेथेच मुलगी असेल तर तिला आईच्या गर्भातच बऱ्याच वेळा मारले जाते. खरं तर आईचे गर्भ हे जग निर्माता अल्लाहच्या योजने नुसार बाळासाठी सर्वात सुरक्षित आणि सर्व सुविधांनीयुक्त स्थान आहे. तिच जागा आज मुलींसाठी सर्वात जास्त असुरक्षित व मृत्यूचे स्थान बनले आहे. कारण अधिकतर स्त्री गर्भपात किंवा स्त्रि भृण हत्येच्या नावावर मुलींची हत्या त्याच ठिकाणी होताना निदर्शनास येते. आज एका निर्दोष मुलीची हत्या किंवा खुन करणे सर्वात सोपे झाले आहे. एका गुंड, बलात्कारी, किंवा खुनी व्यक्तीलाही फांसावर चढविण्या पुर्वी किंवा मृत्यु दंडाची शिक्षा सुनावण्या पुर्वी न्यायधिशा समोर आपली बाजू मांडण्याचा अधिकार



दिला जातो.आपला जीव वाचवण्याची त्याला संधी दिली जाते. परंतु एका निरागस मुलीची स्थिती त्यापेक्षाही बिकट आहे. पोटात जे बाळ आहे ते बोलू शकत नाही बघु शकत नाही, चालु शकत नाही तो आपली भावना व्यक्त करू शकत नाही. म्हणून ते मनुष्य नाही असे मानणे चुकीचे आहे. तरी जर का कोणी असे म्हणत असेल तर एखाद्या अंधळा, लंगडा, किंवा अपंग व्यक्तीला किंवा मानसिक दृष्टया अपंग असलेल्या व्यक्तीला सुद्धा व्यक्ति मानत नाही असे समजावे लागेल. आधुनिक मेडिकल सायन्सने हे सिध्द केले आहे की, गर्भातील बालकामगध्ये सुध्दा मानवी संवेदना अस्तित्वात असतात. आज विज्ञानाच्या प्रगतीने बाळ गर्भात आल्यानंतर काही दिवसातच लिंग निश्चीती करता येते. पण फक्त भारतातच नव्हे तर पूर्ण जगात प्रगत राष्ट्र सुध्दा याला अपवाद नाही की जेथे स्त्रि गर्भपात होत नाही. आधुनिक तंत्रज्ञाने गर्भ परिक्षण {एब्रॉय टेस्टींग} द्वारा काही आठवडयातच माहिति घेतली जाते की गर्भात असणारे बालक हे मुलगा आहे किंवा मुलगी. गर्भात मुलगी आहे हे समजताच



आई, वडिल,व सर्व कुटुंबातील लोक गर्भपात करायला काही वेळा भाग पाडतात. किती निर्यदयी आहे ति आई जी स्वत: एक स्त्रि असून मुलीला जन्म देण्यास तयार नसते. समाजातील खोटया प्रतिष्ठेसाठी एका निर्दोष आणि निरागस जिवाची हत्या करताना तिला काहीच का वाटत नाही.

आमच्या या संदेशामध्ये आम्ही आपल्या समोर काही महत्त्वपूर्ण बाबींचा उलगडा करू इच्छित आहोत की जेणे करून आपल्याला समजेल की आज स्त्री हत्या किती सोप्या रितीने व किती प्रमाणात होत आहे. एका सर्व्हेनुसार भारता मध्ये ४० टक्के मुलींची हत्या भृण हत्या किंवा स्त्री गर्भपाताच्या नावावर होत आहेत. इंग्लंड मध्ये हे प्रमाण २५ टक्के आहे तर चीन मध्ये जन्माला येणा-या ६० टक्के मुलींना जन्मताच त्यांची हत्या केली जाते. अमेरिके मध्ये तर या बाबत कहरच आहे तेथे प्रति दिवस ४५०० गर्भपात केले जातात.त्याचा मध्यांक काढला तर प्रत्येक २० सेंकदात पूर्ण जगात गर्भपात होतात. एका तासात १८० नवजात शिशूंना मृत्युच्या घाट उतरविले जाते. जितक्या वेळेत ही खबर आपल्यापर्यंत




पोहचते तेवढ्यात ९० मुलींचा गर्भातच खून केला जातो. या विषयाला अधिक स्पष्टतेने पाहण्यासाठी आपल्याला हे बघावे लागेल की आज समाजात स्त्री भृण हत्या बाबत लोकांची प्रतिक्रिया काय आहेत.

- १. या विषयात सर्वात पहिली विचार सरणी अशी आहे की, गर्भात येणा-या बाळा मुळे आई, वडिलांच्या अर्थिक परिस्थिती प्रभावीत होईल व शरीरावर त्याचा परिणाम होईल.
- २. परिस्थिती व आईच्या इच्छेनुसार गर्भपात उचित किंवा बरोबर समजले जाऊ शकते.
- ३. असे मत असणा-या लोकांचा त्यामागील लॉजीक असे आहे की, तसे हि घरात खूप मुले आहेत.
- ४. नको असलेल्या बाळाच्या जन्मापसून अनेक समस्या निर्माण होऊ शयकतात.
- ५. कुटंबाची कमाई घटेल.
- ६. अत्ताच नवीन धंदा, नोकरी सुरू केले आहे.बाळ जन्माला आले तर ते सोडावे लागेल.



- ७. आईचे शिक्षण सुरू आहे तर दोन दोन जबाबदा-या कशी घेता येईल .
- ८. नवरा दारू सेवन करणारा आहे दारू पिऊन दंगे करतो त्याचा नवीन जन्मलेल्या मुलांवर ही परिणाम होईल.

डॉ. रैमसे यांच्यानुसार एकाच परिस्थितीतच गर्भपात योग्य समजले जाऊ शक्तो. ती म्हणजे जर का आईच्या जीवाला कोणत्या प्रकारचा धोका असेल तरच अन्यथा याच्या व्यतिरिक्ति गर्भ हत्या करणे ही मानव हत्ये च्या बरोबरच आहे. जर मानवाने म्हण्टले कि लहान सहान आडचणींमुळे गर्भपात करणे योग्य आहे तर या जगात लहान सहान समस्या निर्माण करणा-या प्रत्येक व्यक्तिस मृत्य देणे ही बाब चुकीची ठरणार नाही. जर याच तर्काला या जगामध्ये कायद्याने मान्यता दिली गेली म्हणजेच ज्या आधारावर अनेक देशामध्ये गर्भपाताला कायदेशीर मान्यता दिली गेली आहे तर याच तर्कावर इतर हत्या करणे देखील बेकायदेशीर राहणार नाही. जर असे झाले तर तुम्ही स्वत: विचार करा या जगाची काय अवस्थ होईल.

स्वीडीश फोटोग्राफर लेनॉर्ड नेल्सन ने या सत्येतेची पुष्टी करण्यासाठी आपल्या पुस्तका मध्ये गर्भ शिशूचे विविध अवस्थेतील चित्र घेतले आहेत. जे हे स्पष्ट करतात की, गर्भ शिशूही एक मानवी जीवन आहे. कारण ....




☛ १.) केवळ पाच आठवडयातच बाळाचे हृदय ठोके देणे सुरूवात करते.

☛ २.) सहा {६} आठवडयात १/४ इंच असताना देखील बाळाचे डोके आणि शरीर दिसू लागते.?

☛ ३.) सहा {६} आठवडयातच मेंदूचे कार्य सुरु होतात.

☛ ४.) आठ {८} आठवडयात बोट व हात सुध्दा बनतो.

☛ ५.) १० ते १२ आठवडयात हात हलू शकतो, व अंगठा तोंडा पर्यंत आणून चोखू शकतो.



☛ ६.) १३ आठवडयात शरीराचे पूर्ण भाग स्पष्ट होतात.



हतावर च्या रेघा आणि बोटाच्या खुणाहि दिसू लागतात.

☛ ७.) १५ आठवड्यात हलने-डुलने, घाबरणे, काळोख, उजेडाची जाणीव होते तसेच आनंदची जाणीव होते.

☛ ८.) २५ आठवड्यात डोळे, भुवया, व केस उगणेस सुरूवात होते. व रडण्याची क्षमता येते.

अशा प्रकारे पवित्र कुरआन मध्ये अल्लाहने मानव निर्मिती संदर्भात सांगितले आहे की, ' यात कोणतीही शंका नाही की आम्ही मानवाला खण खणीत मातीच्या सारा पासून निर्माण केले आहे.नंतर त्याला वीर्य बनवून सुरक्षित स्थानी ठेवले आहे. नंतर विर्याला आम्ही जमा झालेले रक्त बनवले, नंतर त्यारक्ताच्या लोथड्याला मासाचा तुकडा बनविला आणि त्यात हाडे बनविली, नंतर हडांवर मांस चडविले मग एका दुसऱ्या रूपात त्याला निर्माण केले. खूप दयाळू आहे तो अल्लाह जो सर्वात चांगली उत्पत्ती करणारा आहे. {कुरआन २३:१२ते १४}



आम्हाला आमच्या निर्मात्याने आईच्या पोटातच जीवन दिले आहे म्हणूनच जाणुन बुजुन केलेला गर्भपात योजनाबध्द हत्या आहे. बाळ जे गर्भातच अल्लाह कडून विकसित होत आहे ते बोलु शकत नाही, जे अबोल आहे,ओरडु शकत नाही, आपल्या जीवनासाठी भीक मागू शकत नाही. मारेकरीच्या हत्या-याला थाबंविण्याची शक्ती त्याच्यात नाही. त्याच्या जीवनाचे संरक्षण गर्भातच नव्हेतर बाहेर अल्यानंतर ही झाले पाहिजे. व हिच जबाबदारी आई वडिलांची असते हच बालक आईच्या गर्भात आपल्या स्वतःला अतिशय सुरक्षित समजते त्याला काय माहिती कि तेच आई व वडील याला मूत्यू देण्यचा प्लान बनवीत आहे किती निर्दयी झीले आपले अंतकरण कि आपण एक मासूम निरागस बाळाला सुद्धा मूत्यू दंड देतो खरे पाहता त्याची तर काहीच चुकी नाही विचार करा जर तुमची या अवस्थेत असताना तुम्हाला देखील मूत्यू दिला असता तर आज तुम्ही हे जग पाहण्याच्या अवस्थेतच नसता. एवढेच नाही तर गर्भातच नव्हेतर जन्मल्या नंतर ही मुलींना मारण्याची पध्दत पुर्वीच्या काळात होती. जे लोक मुलींना



पसंत करत नव्हते ते मुली जन्मल्यावर मारून टाकत असे.

प्रेषित मोहम्मद स.व.स. आणि कुरआन च्या येण्या आगोदर नवजात मुलींना जिवंत दफन केले जात होते. प्रेषित मोहम्मद स.व.स. यांनी फक्त या अनिष्ठ प्रथेचाच अंत केला नाही तर पुरूषांप्रमाणेच स्त्रियांना सुध्दा जिवंत राहण्याचा अधिकार दिला. ‘एका हदीस मध्ये प्रेषित मोहम्मद स.व.स. यांनी सांगितले आहे की, ज्याच्याकडे दोन मुली आहेत व तो त्या चांगल्या रीतीने पालन पोषण करीत असेल तर दोन्ही मुली त्या व्यक्ती साठी नर्कच्या आगे पासून आड बनतील.

कुरआन मध्ये अल्लाहने कोणत्याही प्रकारे मानवास विनाकारण कत्तल करण्यास सक्त मनाई केली आहे.

आपल्या मुलांना गरीबीच्या कारणाने हत्या नका करू. आम्ही तुम्हाला व तुमच्या मुलांना जीविका प्रदान करतो. {कुरआन ६:१५१}

तरी निर्धनतेच्या किंवा गरिबीच्या भिती पोटी आपल्या मुलांना मारून टाकू नका त्यांना व तुम्हाला आम्ही जिविका देतो नि:संदेह त्याची हत्या करणे महापाप आहे.
{कुरआन १७:३१}




गर्भपात फक्त तुमच्या जीवना साठीच हानिकारक नाही तर तुमच्या मृत्यु नंतर ही त्याचे तोटे मोठ्या प्रमाावर आहे. आम्हाला निर्माता अल्लाह ने जीवन दिले आहे म्हणूनच काय केले पाहिजे व काय नाही केले पाहिजे हे तोच चांगल्यारितीने सांगू शकतो. त्याने आपल्या पवित्र ग्रंथ कुरआन मध्ये सर्व मानव जातीला गर्भपात करण्यास विरोध केला आहे. म्हणून आपली जबाबदारी आहे की आपण आपल्या निर्माता अल्लाहच्या अज्ञाचे पालन करत गर्भपता सारख्या वाईट कृत्यापासून दुर राहवे. नाही तर आपल्या मूत्यू नंतर तो सर्वशक्तिमान अल्लाह आपल्याला नर्कात टाकू शकतो. न्याया च्या दिवशी अल्लाह तुमच्या कर्मचा जाब तुम्हाला विचारेल जसे कुरआन ८१ : ८ ते ९ मध्ये स्पष्ट केले आहे.




'आणि जेंव्हा जीवंत गाडलेल्या मुलीला प्रश्न केला जाईल की, तिची कोणत्या अपराधापाई तिची हत्या करण्यात आली.
(कुरआन ८१ : ८ ते ९)

त्या दिवशी गर्भात आपल्या मुली, बहिणींची हत्या करणा-यांना अल्लाह दंड, शिक्षा देईल.आता प्रश्न असा आहे की, आम्ही या पापा पासून कसे सुरक्षित रहा

## गर्भपात किंवा गर्भ हत्येपासून वाचण्याचे काही उपाय :-

१. आपल्या त्या कर्मा पासून आपल्याला पश्चाताप केला पाहिजे ज्याद्वारे आपण गर्भपाताला खूप सोप्या रितीने स्वीकारले होते जर का आपण स्वत: असे केले आहे किंवा असे करण्या मध्ये आपण कोणाचीही मदत केली असेल तर.

२. गर्भात मुलगा असो वा मुलगी आम्हाला अल्लाहकडून सप्रेम भेट समजून स्वीकारले पाहिजे.

३. भारतात मेडिकल टर्मिनेशन ऑफ प्रेगनंसी ॲकर १९७१ नुसार गर्भपात २० आठवडयाच्या आत केले गेल्यास त्यांच्यावर कोणतेही गुन्हे दाखल होत नाही. या कायदयाची



माहिती सर्वांना असायला हवी. सरकार कडे निवेदन केले पहिजे की भारतात गर्भपात बेकायदेशीर ठरवून असे कृत्ये करणा-या लोकांवर गुन्हे दाखल केले पाहिजे.

४. ना जायझ (अवैध) संबध, नाती, आणि लग्ना पुर्वीच्या सेक्समुळे जास्त गर्भपात होतात. या नात्यापासून वाचले पाहिजे.

५. गरीब व गर्भवती स्त्रियांना पैसे आणि काम देऊन त्यांची मदत केली पाहिजे. जेणे करून ते गर्भपाता कडे वळणार नाही.

आपला निर्माता अल्लहाचे भय, नि:संदेह जर आपल्याला समजले की आपला निर्माता आपल्याला बघत आहे आणि प्रत्येक कार्य जे आपण करतो तो त्याचा हिशोब घेणार आहे. तर हिच समज आणि अल्लाहची भिती आपल्याला प्रत्येक वाईट गोष्टींपासून रोकण्यास पुरेशी आहे.

**“कारण कान, डोळे, आणि हृदय, या प्रत्येक गोष्टींची विचार पूस केली जाणार आहे”. {कुरआन १७:३६}**



मानवासाठी कोणत्या गोष्टी लाभदायक आहेत हे फक्त त्याचा निर्माताच सांगू शकतो. आम्हास पाहिजे की आपण आपल्या निर्माताच्या मार्गदर्शन व दिलेल्या शिकवणीनुसार आपले जीवन व्यतीत केले पाहिजे. स्त्री गर्भ हत्या सारख्या महापापाला थांबविण्या व्यतिरिक्त असे अनेक शिकवण व उपदेश आहेत जे अल्लाहने पवित्र कुरआन मध्ये सर्व मानव जातीसाठी मार्गदर्शण म्हणून आहेत. म्हणूनच आम्ही अल बीर च्या तर्फे सर्व बंधू व भगिणींना पवित्र ग्रंथ कुरआन वाचण्यासाठी निमंत्रीत करीत आहोत. जे फक्त मुस्लिम धर्मापुरतेच मर्यादीत नाही. ते सर्व मानव जातीसाठी मार्गदर्शन करणारे आहे.

**रमजान तो महिना आहे ज्यामध्ये कुरआन आवतरला गेला जो लोकांकरिता मार्गदर्शन आणि जो मार्गदर्शक आणि सत्य व असत्याच्या दरम्यान निर्णायक आहे. (कुरआन सुरह २-१८५)**




आम्हास पूर्ण विश्वास आहे की जर मानवाने पवित्र कुरआनला आपले मार्गदर्शक बनविले तर गर्भपात सारख्या वाईट प्रथे पासून प्रत्येक मुलीला वाचवण्यात आम्हाला यश मिळेल आणि भारतातुन एक अनिष्ठ प्रथेचा नाश होईल.

तर वाट कोणाची पाहता स्त्री गर्भपात च्या विरोधात उभे व्हा आणि भारताला सामाजिक, शैक्षणिक, स्वच्छ, व सुरक्षित, आणि शक्तिशाली तसेच स्त्रि गर्भपात मुक्त राष्ट्र बनवुया

**स्त्रि गर्भपाता पासून प्रत्येक मुलीला वाचवा.**

आपल्या शरीर आणि आत्म्याच्या संपूर्ण मार्गदर्शनासाठी वाचा पवित्र कुरआन.

ज्यांना कुरआन वाचण्याची इच्छा आहे असे वाचक आपल्या भाषेत नि:शुल्क पवित्र कुरआन मिळविण्यासाठी कॉल करा ही भेट सर्व जाती व धर्मियांसाठी उपलब्ध आहे. ऑर्डर करण्यासाठी फक्त हे करा.

- ☑ **१. नाव**
- ☑ **२. मोबाइल नंबर**
- ☑ **३. पत्ता**
- ☑ **४. कुरआनची भाषा**

खालील फोन नंबर वर कॉल किंवा एस.एम.एस. करू शकता हे पवित्र कुरआन आपल्या घरी नि:शुल्क मिळविण्या करीता त्वरीत कॉल करा.




**Call for Mumbai**

**+91 8767 333555 / 9987 445522**

**Call for Pune**

**+91 9021259021 / 8484841847**

**www.albirr.in**

**Email : freequran@albirr.in**

**Branches**

**Mumbai ◆ Mumbra ◆ Mira Road ◆ Pune ◆ Mangaon (Kokan)**